**<u>कृषि विषयक आकडेवारीचा वेळेवर अहवाल देण्याच्या योजनेस</u>**
**सन २०१६-१७ करीता प्रशासकीय मान्यता देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**कृषी, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः सांख्यिकी -२०१६/प्र.क्र.१६४/११-अे**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय (विस्तार), मुंबई-४०० ०३२.
तारीख: २७ डिसेंबर, २०१६

<u>वाचा -</u>

१) शासन निर्णय, कृषि व पदुम विभाग क्र. पदसातत्य -२०१६/प्र.क्र.५/११-अे, दि.२९.२.२०१६
२) शासन परिपत्रक, वित्त विभाग क्र.अर्थसं-२०१५/प्र.क्र.८५/अर्थ -३, दि.२०.४.२०१६
३) भारत सरकार, कृषि मंत्रालय, कृषि व सहकार विभाग यांचे पत्र क्र. G २००११/१/ २०१६-EA, दि.२३.५.२०१६
४) कृषि आयुक्तालयाचे पत्र क्र.सां.-४/आयसीएस/३३/२०१६, दि.४.६.२०१६
५) शासन निर्णय, कृषि व पदूम विभाग क्र. पदसातत्य-२०१६/प्र.क्र.५/११-अे दि. २०.१०.२०१६

<u>प्रस्तावना -</u>

कृषिविषयक आकडेवारीचा वेळेवर अहवाल देण्याची योजना या योजनेकरिता केंद्र शासनाने सन २०१६-१७ या आर्थिक वर्षासाठी महाराष्ट्र राज्याकरिता उपरोक्त दिनांक २३.५.२०१६ च्या पत्रान्वये रु.२३४.०० लाख इतक्या रकमेस प्रशासकीय मान्यता दिलेली आहे.

२. कृषिविषयक आकडेवारीचा वेळेवर अहवाल देण्याची योजना या १०० टक्के केंद्र पुरस्कृत योजनेतील ५८ अस्थायी पदे दिनांक १ मार्च, २०१६ ते ३० सप्टेंबर, २०१६ पर्यंत चालू ठेवण्यास उपरोक्त दिनांक २९.२.२०१६ च्या शासन निर्णयान्वये व त्यापुढे दि.२९.०२.२०१७ पर्यंत सुरु ठेवण्यास दि. २०.१०.२०१६ च्या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आलेली आहे.

३. कृषिविषयक आकडेवारीचा वेळेवर अहवाल देण्याची योजना या १०० टक्के केंद्र पुरस्कृत योजनेस केंद्र शासनाने दिलेल्या प्रशासकिय मान्यतेच्या मर्यादेत व राज्य शासनाच्या श्वेपतपुस्तिकेप्रमाणे (White book) सन २०१६-१७ मध्ये मंजूर केलेल्या तरतूदीनुसार राज्य शासनाची बाबनिहाय प्रशासकीय मान्यता देण्याकरिताचा प्रस्ताव कृषि आयुक्तालयाने उपरोक्त दि.४.६.२०१६ च्या पत्रान्वये सादर केलेला आहे.

## शासन निर्णय-

कृषिविषयक आकडेवारीचा वेळेवर अहवाल देण्याची योजना १०० टक्के केंद्र पुरस्कृत असून या योजनेकरिता सन २०१६-१७ साठी पुढील तक्त्यात दर्शविण्यात आल्यानुसार रु.२३४.०० लाख इतक्या रकमेस शासनाची प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

**(रक्कम रुपये लाखात)**

| अ.क्र. | बाब | सन २०१६-१७ केंद्र शासनाने दिलेली प्रशासकीय मान्यता | सन २०१६-१७ ची मूळ अर्थसंकल्पीय तरतूद | सन २०१६-१७ राज्य शासनाची प्रशासकीय मान्यता |
|---|---|---|---|---|
| १ | ०१-वेतन | २३४.०० | २४१.०० | २३४.०० |
| २ | ११-देशांतर्गत प्रवास खर्च | | २.०० | |
| ३ | १३-कार्यालयीन खर्च | | ४.०० | |
| ४ | १६-प्रकाशने | | २.०० | |
| ५ | २४-पेट्रोल व वंगण | | १.०० | |
| एकूण | | २३४.०० | २५०.०० | २३४.०० |

२. प्रस्तुत खर्च खालील लेखाशिर्षाखाली सन २०१६-१७ करिता मंजूर केलेल्या अर्थसंकल्पीय तरतूदीतून भागविण्यात यावा -

**"मागणी क्रमांक डी-३, २४०१, पीक संवर्धन,**
**(००) (१११) कृषि अर्थशास्त्र व सांख्यिकी**
**(००) (०९) कृषिविषयक आकडेवारीचा वेळेवर अहवाल देणे,**
**(१०० टक्के केंद्र पुरस्कृत) (२४०१ २५६९)"**

३. प्रस्तुत प्रयोजनार्थ सहाय्यक संचालक (लेखा-१), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे- ५ यांना आहरण व संवितरण अधिकारी तर कृषि संचालक, (विस्तार व प्रशिक्षण )यांना नियंत्रण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

४. प्रस्तुत शासन निर्णय नियोजन विभाग व वित्त विभाग यांच्या मान्यतेने व त्यांच्या अनौपचारीक संदर्भ अनुक्रमे क्रमांक ९९/१४३१, दि.८.८.२०१६ व क्र.४०५/अर्थ-१३, दि.३०.८.०१६ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१६१२२८११२७१५२२०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Sharad Balkrishna Pawaskar

Digitally signed by Sharad Balkrishna Pawaskar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Under Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Sharad Balkrishna Pawaskar
Date: 2016.12.28 11:30:24 +05'30'

**( श.बा.पावसकर )**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे (५ प्रती)
२. कृषि संचालक (वि.प्र.), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे-५
३. मुख्य सांख्यिक, कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे-५
४. सहाय्यक संचालक (लेखा-१), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे-५
५. सहाय्यक संचालक (अर्थसंकल्प), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे-५
६. महालेखापाल, (लेखा परिक्षा/लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर
७. संचालक, लेखा व कोषागारे, नवीन प्रशासन भवन, मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२
८. जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे
९. वित्त विभाग (व्यय-१) / (अर्थसंकल्प-१३) / (अर्थोपाय), मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
१०.नियोजन विभाग (कार्यासन-१४३१), मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
११.अपर मुख्य सचिव (कृषि) यांचे स्वीय सहाय्यक, कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
१२.उपसचिव (११-अे / २-अे) यांचे स्वीय सहाय्यक, कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
१३.कक्ष अधिकारी (२-अे), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३
१४.निवड नस्ती, का.११-अे.